२०१४१२१७०१२३०७०८१२१८

**पाटबंधारे प्रकल्पांच्या विस्तार व सुधारणा तसेच विशेष दुरुस्तीच्या कामासाठी आर्थिक मापदंड निर्धारित करण्यासाठी समितीची नियुक्ती.**

**महाराष्ट्र शासन,**
**जलसंपदा विभाग,**
शासन निर्णय क्र. मापदंड २००८/(२९३/०८)/सिंव्य(कामे),
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- ~~जुलै~~ २००८
४ मार्च २

**प्रस्तावना :-** राज्याच्या जलसंपत्ती विकासामध्ये पाटबंधारे प्रकल्पांचे महत्वपूर्ण योगदान आहे. पूर्ण झालेल्या पाटबंधारे योजनांच्या वार्षिक परिरक्षण व दुरुस्ती बरोबरच त्यांची विशेष दुरुस्ती तसेच प्रसंगवशात उंची वाढविणे, नूतनीकरण, आधुनिकीकरण, पुनर्प्रस्थापन, विस्तार, सुधारणा, पुनर्रचीकरण (remodeling) इ. कामे प्रकल्पांच्या जीवनकाळात करावी लागतात. शासनाकडे अशा कामांचे प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेसाठी येतात. ही कामे मूळ कामे समजली जातात. तसेच ती योजनांतर्गत लेखाशीर्षाखाली मंजुर करणे योग्य ठरते.

विशेषतः विशेष दुरुस्तीची तसेच धरणफुटीमुळे कराव्या लागणाऱ्या पुनर्प्रस्थापनेच्या कामासारखी कामे अनिवार्य असतात. ती न केली तर मुळात केलेली गुंतवणूक व्यर्थ ठरुन लाभार्थी सिंचनास मुकतात, तर शासनाला महसुलामध्ये कमतरता येते. उंची वाढविणे, नूतनीकरण इ. सारख्या विस्तार व सुधारणा कामांमुळे प्रकल्पाची जलधारण क्षमता, सिंचन क्षमता यामध्ये वाढ होते. त्यामुळे अतिरिक्त लाभ संभवतात. तथापि, अशा कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करताना कोणतेही आर्थिक मापदंड सध्या लावले जात नाहीत. प्राप्त परिस्थितीत अशा प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता दिल्यास भविष्यात शासनावर मोठे आर्थिक दायित्व निर्माण होईल व त्यामुळे आर्थिक संतुलनावर परिणाम होईल. त्यामुळे अशा कामांची आर्थिक जबाबदारी शासनाने स्वीकारताना मापदंड लावण्याची गरज भासू लागली. सार्वजनिक बांधकाम विभागाकडे अशा कामांना आर्थिक मापदंड विहित केलेले आहेत. तथापि त्या विभागाची बहुतांशी कामे ही त्याच त्याच प्रकारची असल्यामुळे व त्यांचे प्रमाणीकरण (standardisation) करणे शक्य असल्यामुळे असे मापदंड ओघानेच येतात. तथापि, जलसंपदा विभागाकडील कामांची अशी स्थिती नाही.

प्रकल्पांच्या नियोजनामध्ये गृहीत धरलेले आर्थिक निकष अशा विस्तार व सुधारणा तसेच विशेष दुरुस्तीच्या कामांना कशा प्रकारे लावता येतील व ही कामे घेताना कोणत्या कामांना प्राधान्य द्यावयाचे यासाठी आर्थिक मापदंड निर्धारित करण्याची आवश्यकता निर्माण झाली. असे मापदंड निर्धारित करण्यासाठी विभागाच्या अधिपत्याखालील अधिकाऱ्यांची समिती नियुक्त करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याला अनुलक्षून शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय** :- पाटबंधारे प्रकल्पांच्या विस्तार व सुधारणा तसेच विशेष दुरुस्तीच्या कामासाठी आर्थिक मापदंड निर्धारित करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती नियुक्त करण्यात येत आहे :-

१) अध्यक्ष - श्री. मा.लो.गवळे, मुख्य अभियंता, उ.म.प्र.नाशिक

२) सदस्य - श्री. अ.वा.सुर्वे, अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे

श्री. स.दे.कुलकर्णी, अधीक्षक अभियंता, अकोला पा.मं. अकोला,

श्री. र.ना.ठाकरे, अधीक्षक अभियंता चंद्रपूर पा.प्र.मं. चंद्रपूर

श्री. अ.प्र.कोहिरकर, अधीक्षक अभियंता व प्रशासक लाक्षेविप्रा, औरंगाबाद

३) सदस्य सचिव- श्री. इ.स.चौधरी, अधीक्षक अभियंता व प्रशासक लाक्षेविप्रा, नाशिक

**समितीची कार्यकक्षा :** समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

१) पाटबंधारे प्रकल्पांच्या विस्तार व सुधारणा तसेच विशेष दुरुस्ती याखाली करावयाच्या कामांची व्याप्ती ठरविणे.

२) अशा कामांना प्रशासकीय मान्यता देण्यासाठी लागू करावयाचे आर्थिक मापदंड निर्धारित करणे

३) मापदंड परिगणीत करण्याची पध्दत विहित करणे

४) कामांचे प्राधान्य निश्चित करण्यासाठी निकष ठरविणे (प्रकल्पाचे वय, कामगिरी इ.)

५) प्रकल्पाच्या जीवन काळात किती वेळा व किती कालावधीनंतर करावयाची याचे मापदंड ठरविणे

**समितीचा कार्यकाल :-** समितीचे कामकाज सुरु झाल्यापासून ३ महिन्यांच्या आत समितीने अहवाल सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( चं. रा. नेजाळे )**
**शासनाचे उप सचिव**

प्रत,

मा. राज्यपाल यांचे सचिवालय, राजभवन, मलबार हिल, मुंबई,

मा. सभापती/अध्यक्ष, विधानसभा/विधान परिषद, विधानभवन, मुंबई (२ प्रती)

मा. विरोधीपक्ष नेते, विधानसभा/विधान परिषद, विधानभवन, मुंबई (२ प्रती)

मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,

प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,